**राज्य योजना सन २०२२-२३ अंतर्गत ग्रामपरिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) अंतर्गत कोल्हापूर, गडचिरोली, ठाणे, चंद्रपूर, नाशिक, पुणे व नागपूर या एकूण ७ वनवृत्तातील क्षेत्रावर रोपवनांची प्रथम, तृतीय व चतुर्थ वर्षातील बांधील कामे करण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०२२/प्र.क्र. ८२/फ-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ०१ मार्च, २०२३

संदर्भ :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/यो/इए/संवव्य/प्र.क्र.०३/२०२२-२३/१९१, दि.२९.०७.२०२२, दि.३०.११.२०२२, दि.२९.१२.२०२२, दि.१२.०१.२०२३ व दि.०९.०२.२०२३.

३) शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०२२/प्र.क्र. ८२/फ-२, दि.३१.०१.२०२३.

प्रस्तावना :-

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांनी संदर्भाधीन यांनी मागणी केल्यानुसार सन २०२२-२३ करिता राज्य योजनांतर्गत "ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम " (२४०६ १५२१) या योजनेंतर्गत पुणे वनवृत्तासाठीच्या संत तुकाराम वनग्राम योजने अंतर्गत जिल्हास्तरीय पुरस्कारासाठी ०५-बक्षिसे या सविस्तर शिर्षांतर्गत रु.२.१६ लक्ष तसेच ठाणे व नागपूर वनवृत्तातील संरक्षित वनांचे लगत क्षेत्रातील गावातील सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना सवलतीच्या दराने कुकींग गॅस वाटप करण्यासाठी ५०- इतर खर्च या सविस्तर शिषांतर्गत रु.३१७.६५ लक्ष अशा एकूण रु.३१९.८१ लक्ष इतका निधी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

तसेच प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपुर यांनी संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये सन २०२२-२३ करिता राज्य योजनांतर्गत "ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम " (२४०६ १५२१) या योजनेंतर्गत कोल्हापूर, गडचिरोली, ठाणे, चंद्रपूर, नाशिक, पुणे व नागपूर या एकूण ७ वनवृत्तातील एकूण २५४३ हे. क्षेत्रावर रोपवनांची प्रथम, तृतीय व चतुर्थ वर्षातील बांधील कामे करण्यासाठी रु.३४८.८२ लक्ष निधी (०२- मजूरी करीता २२३.२१ लक्ष आणि २१-पुरवठा व सामग्री करीता १२५.६१ लक्ष) उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव मंजूरीस्तव सादर केला आहे.

राज्य योजनेअंतर्गत "ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम " (२४०६ १५२१) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करिता एकूण रु. १७००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. तसेच अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्सवर) २४०६ १५२१ या योजनेकरिता ०२- मजूरी या सविस्तर शिर्षांतर्गत रु.६३१.४६ लक्ष व २१-पुरवठा व सामग्री या सविस्तर शिर्षांतर्गत रु.१०४.२६ लक्ष इतका निधी वितरणासाठी उपलब्ध आहे.

त्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी अनुदानाची मागणी केल्यानुसार कोल्हापूर, गडचिरोली, ठाणे, चंद्रपूर, नाशिक, पुणे व नागपूर या एकूण ७ वनवृत्तातील क्षेत्रावर रोपवनांची प्रथम, तृतीय व चतुर्थ वर्षातील बांधील कामे करण्यासाठी ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीपैकी कोल्हापूर, गडचिरोली, ठाणे, चंद्रपूर, नाशिक, पुणे व नागपूर या एकूण ७ वनवृत्तातील एकूण २५४३ हे. क्षेत्रावर रोपवनांची प्रथम, तृतीय व चतुर्थ वर्षातील बांधील कामे करण्यासाठी **०२- मजूरी या सविस्तर शिषांतर्गत २२३.२१ लक्ष आणि २१- पुरवठा व सामग्री या सविस्तर शिषांतर्गत रु.१०४.२६ लक्ष अशा एकूण रु.३२७.४७ लक्ष इतक्या रक्कमेस उद्दिष्ट निहाय खर्च करण्यास** नमूद अटी व शर्तीचे अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे. सदरहू शासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी.

२) सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

३) सदर योजनेकरिता वितरित केलेला निधी खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४) त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखील दक्षता घ्यावी.

५) सदर प्रस्तावांतर्गत करावयाच्या कामाचा खर्च मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीव, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (बिगर आदिवासी उपयोजना) १०१(११) वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (११)(१०) ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (संयुक्त वनव्यवस्थापन) कार्यक्रम (२४०६ १५२१) राज्य योजनांतर्गत योजना या लेखाशिर्षांतर्गत सन २०२२-२३ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकांन्वये तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३०११७४७०७०२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, pseudonym=E356063E1710100620E953749C8FA6F85E9A154E, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2023.03.01 17:51:02 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
उप सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक.
४) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक.
५) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), कोल्हापूर, गडचिरोली, ठाणे, चंद्रपूर, नाशिक, पुणे व नागपूर.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
८) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर, गडचिरोली, ठाणे, चंद्रपूर, नाशिक, पुणे व नागपूर.
१०) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
११) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.